**पोशीर प्रकल्पास (ता. कर्जत, जि. रायगड) प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.२०२५ /(७१/२०२५)/जसंअ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३० मे, २०२५

**संदर्भ :**

१) अधीक्षक अभियंता तथा सदस्य सचिव, राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती-२ पुणे यांचे पत्र जा.क्र. राताससस-२/कोसंचिवि-३/उ. अ.४/पोशीर प्रकल्प/१३५१/२०२४, दि. २८/१०/२०२४.
२) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ ठाणे यांचे पत्र जा.क्र.कोंपाविम/तां४/पोशीर/प्र.मा/६१५/सन२०२५, दि. १३/०२/२०२५.

**प्रस्तावना -:**

मुंबई महानगर प्रदेशासाठी ( मुंबई  वगळून ) पाणी पुरवठ्याचे उद्भव निश्चित करण्यासाठी दि. २८/०१/१९९९ रोजी नेमलेल्या डॉ. माधवराव चितळे समितीच्या अहवालानुसार विविध उपप्रदेशाची पाण्याची गरज भागविण्याकरिता सध्या उपलब्ध असलेल्या स्त्रोतांव्यतिरिक्त नवीन स्त्रोत विकसित करुन द्यावे लागतील. सदर अहवालानुसार बृहन्मुंबई व्यतिरिक्त मुंबई महानगर क्षेत्रांसाठी स्त्रोत विकासाचा समयबध्द कार्यक्रम हाती घेणे आवश्यक आहे.

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून ठाणे आणि रायगड जिल्ह्यांच्या वाढत्या नागरीकरणाचा विचार करुन विकास आराखड्यात मोठ्या नागरी आणि औद्योगिक संकुलांचे नियोजन केलेले आहे. याकरिता पाणी ही या संकुलाची मूलभूत गरज आहे. या दृष्टीने सदर गरज भागविण्यासाठी प्रस्तावित पोशीर प्रकल्प हा मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणासाठी अत्यंत आवश्यक असा प्रकल्प आहे. सदर प्रकल्पाचा प्रमुख उद्देश मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण क्षेत्र, नवी मुंबई व उल्हासनगर महानगरपालिका तसेच अंबरनाथ व बदलापूर नगरपरिषद यांना पिण्यासाठी व औदयोगिक कामाकरिता पाणी पुरवठा करणे आहे.  तसेच सदर प्रकल्पाद्वारे ३ मेगावॅट विद्युत निर्मिती व पूर नियंत्रण करणेही प्रस्तावित आहे.

त्याअनुषंगाने पोशीर नदीवर १२.३४ टीएमसी क्षमतेचे धरण बांधणे प्रस्तावित आहे. सदर प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत "उर्वरित महाराष्ट्र" या प्रदेशांतर्गत आहे.

संदर्भीय पत्र क्र. १ अन्वये राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने प्रस्तावाची छाननी करुन त्यातील मुद्दा क्र. २७ च्या अधिन राहुन प्रकल्पास शिफारस केली आहे. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी राज्य तांत्रिक सल्लागार समितीने उपस्थित केलेल्या मुद्यांचे अनुपालन अहवालासह प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने योजनेच्या प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

पोशीर प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून जलसंपदा विभागाच्या सन २०२३-२४ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ तसेच महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सन २०२३-२४ च्या दरसूचीवर आधारित एकूण रु. ६३९४.१३ कोटी (रुपये सहा हजार तीनशे चौऱ्याण्णव कोटी तेरा लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. पाणी वापरावर आधारित लाभधारक संस्थांची भागभांडवली खर्चातील हिस्सेदारी खालीलप्रमाणे राहील:

| **अनु.क्र.** | **लाभधारक** | **भागभांडवली खर्चातील हिस्सेदारी** | |
|---|---|---|---|
| | | **टक्केवारी (%)** | **रक्कम (रु. कोटी)** |
| १ | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण | ३३.९६ | २१७१.४५ |
| २ | नवी मुंबई मनपा | ४३.५३ | २७८३.३७ |
| ३ | उल्हासनगर मनपा | ९.५६ | ६११.२८ |
| ४ | बदलापुर नगरपरिषद | ५.८८ | ३७५.९७ |
| ५ | अंबरनाथ नगरपरिषद | ७.०७ | ४५२.०६ |
| **६** | **एकूण** | **१००** | **६३९४.१३** |

त्यानुसार लाभधारक मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नवी मुंबई महानगरपालिका, उल्हासनगर महानगरपालिका, बदलापुर व अंबरनाथ नगरपरिषद यांनी भाग भांडवली अंशदान रक्कम उपलब्ध करुन द्यावी. हा प्रकल्प कोकण पाटबंधारे विकास महामंडळाद्वारे ठेव तत्वावर उभारण्यात यावा.

२. सदर प्रकल्प राबविण्याकरीता कोकण पाटबंधारे विकास महामंडळ व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,नवी मुंबई व उल्हासनगर महानगरपालिका तसेच अंबरनाथ व बदलापूर नगरपरिषद यांच्यात एकत्रित सामंजस्य करारनामा (MOU) करण्यात यावा.

३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली सुकाणु समितीची स्थापना करावी. सदर सुकाणु समितीमध्ये लाभधारक स्थानिक स्वराज्य संस्था व कोकण पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या प्रतिनिधींचा समावेश असावा. प्रकल्प अंमलबजावणी (भौतिक व आर्थिक) सुकाणु समितीमार्फत करण्यात यावे.

४. कोकण पाटबंधारे विकास महामंडळाने मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या समन्वयाने संयुक्तपणे प्रकल्प कालबद्धरीत्या पुर्ण करण्याचा आराखडा तयार करावा व त्यानुसार मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी लाभधारक स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सहाय्याने निधी उपलब्धतेबाबतची कार्यवाही करावी.

५. सर्व वैधानिक मान्यता तसेच वनजमीन संपादनाशिवाय बांधकाम हाती घेऊ नये .

६. महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता प्राप्त करून घ्यावी.

७. आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करू नये.

८. सर्व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.

९. प्रकल्पाशी संबंधीत निविदांच्याबाबत अतिरिक्त दायित्व उद्भविल्यास त्यास सर्व प्रथम सुकाणु समितीची मान्यता घ्यावी. अशी मान्यता मिळाल्याशिवाय निविदांवर कोणतेही वाढीव दायित्वाचे काम करण्यात येऊ नये. तसेच खर्चही करण्यात येऊ नये. यासंबंधी क्षेत्रीय कार्यकारी अभियंता व अधिक्षक अभियंता यांची जबाबदारी राहील.

१०. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील मुद्द्यांची पूर्तता करावी. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने उपस्थित केलेल्या मुद्द्यांबाबत भविष्यात कोणतीही अनियमितता झाल्याचे निदर्शनास आल्यास त्याची जबाबदारी महामंडळाची राहील.

११. सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपूर्णपणे महामंडळाची राहील.

१२. प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहीत केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे.

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा परिशिष्ट-अ मध्ये सोबत जोडला आहे .

सदर योजनेसाठीचा खर्च “Civil Deposit Contribution Work Capital Outlay By Mumbai Metropolitan Region Development Authority (MMRDA) and concerned local bodies contribution to Konkan Irrigation Development Corporation" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व मा. मंत्रीमंडळाने दि. २०/०५/२०२५ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२५०५३०१६२८५६५७२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SAVITA
CHANDRASHEKHAR
BODHEKAR

Digitally signed by SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=c8ca43b8af581a3826084d1463fa7e004e47a9457ec0be246ec1b6e31297909a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2E11F2710D714EA0D63E58112977EFBE2A7E923B4738CFD1CF4206BF361E0575, cn=SAVITA CHANDRASHEKHAR BODHEKAR
Date: 2025.05.30 16:30:44 +05'30'

**( सविता बोधेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री ( वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव.
४. मा.उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव.
५. मा.मंत्री, जलसंपदा (कोकण, विदर्भ, तापी खोरे विकास महामंडळ) यांचे खासगी सचिव.
६. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
९. अपर मुख्य सचिव, नगरविकास विभाग-१, मंत्रालय,मुंबई-३२.
१०.अपर मुख्य सचिव, नगरविकास विभाग-२, मंत्रालय,मुंबई-३२.
११.महालेखापाल (लेखापरीक्षा/अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर.
१२.सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३.सचिव (प्रस), जलसंपदा विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४.सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
१५.कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१६.आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई
१७.आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका, बेलापूर
१८.आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर
१९.मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद, अंबरनाथ
२०.मुख्याधिकारी, बदलापूर नगरपरिषद, बदलापूर
२१.मुख्य अभियंता, जलविज्ञान व धरण सुरक्षितता, नाशिक.
२२.मुख्य अभियंता, जलसंपदा कोकण प्रदेश, मुंबई
२३.आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४.अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा -ठाणे.
२५.जसंअ कार्यासन संग्रहार्थ.

**परिशिष्ट- अ**

**शासन निर्णय क्र. २०२५ /(७१ /२०२५)/जसंअ दि. ३०/०५/२०२५ सोबतचे परिशिष्ट**

**पोशीर प्रकल्प**

प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदीचा गोषवारा

| **अ.क्र.** | **उपशिर्ष** | **प्रस्तावित किंमत (रु. कोटी)** |
|---|---|---|
| १ | अ-प्राथमिक | १.९४ |
| २ | ब- भूसंपादन | ३३०३.५९ |
| ३ | सी- कामे | २६९८.९७ |
| ४ | डी- विमोचक | २३.४० |
| ५ | के- इमारती | ५.०९ |
| ६ | एम - वृक्षारोपण | ०.७२ |
| ७ | ओ- संकीर्ण | ७.१६ |
| ८ | पी- देखभाल | २७.७२ |
| ९ | क्यु - हत्यारे व संयंत्रे | ०.५० |
| १० | आर- दळणवळण | ४४.०९ |
| ११ | **एकूण** | **६११३.१८** |
| १२ | अनुषंगीक खर्च | २८०.९६ |
| १३ | **एकूण** | **६३९४.१३** |